**नलिका वितरण प्रणाली अंतर्गत सर्वेक्षण, अन्वेषण, संकल्पन, निविदा प्रक्रिया, गुण नियंत्रण, बांधकाम तसेच देखभाल दुरुस्ती इत्यादी कामाकरिता मार्गदर्शक ठरेल अशी हस्तपुस्तिका तयार करण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०१९/(प्र.क्र.३/२०१९)/जसं (धोरण)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १२/०२/२०१९.

**प्रस्तावना :-**

नलिका वितरण प्रणाली अंतर्गत बांधकामाधीन, निविदास्तर, प्रस्तावित कामे तसेच तद्‌नंतरची देखभाल दुरुस्ती विषयाची संपूर्ण कार्यवाही निर्दोषपणे व्हावी, यासाठी गुणवत्ता मानकांबाबतच्या स्पष्टतेसह केंद्रीय जल आयोगाची मार्गदर्शक सूचनांचा (Central Water Commission Guidelines) समावेश असलेली हस्तपुस्तिका (Hand book) तयार करण्याचे प्रस्तावित आहे, जेणेकरुन क्षेत्रिय स्तरावर नलिका वितरण प्रणाली यशस्वीरित्या राबविणेसाठी सुसंगत निर्णय घेणे शक्य होईल. याकामी मार्गदर्शक ठरेल अशी हस्तपुस्तिका तयार करण्यासाठी समिती गठीत करणे प्रस्तावित आहे.

**शासन निर्णय :-**

नलिका वितरण प्रणाली अंतर्गत सर्वेक्षण, अन्वेषण, संकल्पन, निविदा प्रक्रिया, गुण नियंत्रण, बांधकाम तसेच देखभाल दुरुस्ती इत्यादी कामाकरिता मार्गदर्शक ठरेल अशी हस्तपुस्तिका तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे समितीचे गठन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | महासंचालक, मेरी. | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद. | सदस्य |
| ३ | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे. | सदस्य |
| ४ | मुख्य अभियंता, गोसीखूर्द प्रकल्प मंडळ, नागपूर. | सदस्य |
| ५ | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे. | सदस्य |
| ६ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई. | सदस्य |
| ७ | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगांव. | सदस्य |
| ८ | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक. | सदस्य-सचिव |

समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल :-

१) संकल्पनाची कार्यपध्दती, उपलब्ध असलेल्या सॉफ्टवेअरचा वापर या सर्व बाबी लक्षात घेऊन मानके निश्चित करणे.

२) गुणनियंत्रणाबाबत प्रमाणके निश्चित करणे (प्रामुख्याने Pipe testing before & after its laying, pipe laying etc.)

३) नलिका वितरण प्रणालीच्या देखभाल व दुरुस्ती (O & M) बाबतच्या मार्गदर्शक सूचना तयार करणे.

४) अंदाजपत्रक तयार करणेबाबत मार्गदर्शक सूचना तयार करणे.

५) समितीने बांधकामाधीन ठिकाणी स्थळ पाहणी करुन अभ्यास करावा व त्याबाबतचे निरीक्षण नोंदवावे.

उपरोक्तनुसार कार्यवाही करुन सर्व समावेशक अशी हस्तपुस्तिका समितीने सादर करण्याचा कालावधी ३ महिन्यांचा राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१२१७०६४२८४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandeo
Ananda Bagade

Digitally signed by Dnyandeo Ananda Bagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6c9c3f117cf64b38033df6ee6108697532342ef3db994d443607916435f8516, serialNumber=857832272f9c6e57a4d72f8a22cf41cccb1c816e7374da487ed5ee3e377def65, cn=Dnyandeo Ananda Bagade
Date: 2019.02.12 17:08:44 +05'30'

**( ज्ञा.आ.बागडे )**
शासनाचे उप सचिव.

**प्रत,**

१. स्वीय सहायक, प्रधान सचिव,(जलसंपदा), मंत्रालय,मुंबई,
२. स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
३. स्वीय सहायक, सचिव (प्र.स.),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
४. महासंचालक, मेरी, नाशिक,
५. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग,मुंबई,
६. स्वीय सहायक,सर्व मुख्य अभियंता व सह सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,औरंगाबाद,
८. मुख्य अभियंता (स्थापत्य),जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण,पुणे,
९. मुख्य अभियंता,गोसीखूर्द प्रकल्प मंडळ,नागपूर,
१०. मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग,पुणे,
११. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना,नाशिक,
१२. स्वीय सहायक, सर्व अधीक्षक अभियंता व उप सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१३. जलसंपदा विभाग, जसं (धोरण) कार्यासन/निवड नस्ती.